महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक मभाप-1087/14/सीआर-2/87/20,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 30 डिसेंबर 1987.

## नि र्ण य

राजपत्रित अधिका-यांसाठी आणि अराजपत्रित कर्मचा-यांसाठी अनुक्रमे शासन निर्णय, क्रमांक:मभाप-1567/1729-म, दिनांक 3 ऑगस्ट 1967 व शासन निर्णय, क्रमांक: मभाप-1569/20990-म, दिनांक 21 जून 1969 अन्वये मराठी भाषा परीक्षा नियमावल्या लागू करण्यात आल्या होत्या. शासन आता असे आदेश देत आहे की, मराठी भाषा परीक्षा नियमावली भारतीय संविधानाच्या अनुच्छेद 309 च्या परंतुकान्वये अधिसूचनेच्या स्वरुपात राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी. अधिसूचनेची प्रत (इंग्रजी व मराठी) सोबत जोडण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि. गो. पाध्ये,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
लोकायुक्त/उप लोकायुक्त, मुंबई (पत्राने),
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे कार्यकारी अधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-2, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-2, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयातील विभागांच्या नियंत्रणाखालील इतर सर्व विभागाध्यक्ष व कार्यालय प्रमुख,
निवड फाईल,
सर्वसाधारण नस्ती.

## अधिसूचना

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई 400 032.
दिनांक 30 डिसेंबर 1987.

भारताचे संविधान

क्रमांक: मभाप-1087/14/सीआर-2/87/20, भारताच्या संविधानाचा अनुच्छेद 309 यांच्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन आणि याबाबतीत काढण्यात आलेल्या आणि राज्यात किंवा राज्याच्या कोणत्याही भागात अंमलात असलेल्या सर्व विद्यमान नियमांचे आणि आदेशांचे अधिक्रमण करुन महाराष्ट्राचे राज्यपाल, महाराष्ट्र राज्यातील शासकीय कर्मचा-यांच्या (न्यायिक विभागातील कर्मचा-यांव्यतिरिक्त) मराठी भाषा परीक्षेच्या संबंधात, याद्वारे, पुढील नियम करीत आहेत.

1. या नियमांना, महाराष्ट्र शासकीय कर्मचारी (न्यायिक विभागातील कर्मचा-यांव्यतिरिक्त) मराठी भाषा परीक्षा नियम, 1987 असे म्हणावे.

2. या नियमांत, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर, -

(अ) "परिशिष्ट" म्हणजे या नियमांना जोडलेले परिशिष्ट,

(ब) "मंडळ" म्हणजे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरजी 1462-एम, दिनांक 14 फेब्रुवारी, 1963 याद्वारे घटित केलेले एतदर्थ मंडळ (मराठी भाषा परीक्षा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई 400 032,

(क) "परीक्षा" म्हणजे या नियमांद्वारे विहित केलेल्या आणि मंडळाकडून वेळोवेळी घेण्यात येणा-या निम्नस्तर व उच्चस्तर मराठी भाषा परीक्षा,

(ड) "विद्यमान नियम" म्हणजे हे नियम शासकीय राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या तारखेच्या लगत-पूर्वी, अंमलात असलेले राजपत्रित व अराजपत्रित शासकीय कर्मचा-यांच्या मराठी भाषा परीक्षासंबंधीचे नियम व आदेश,

(इ) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन,

(फ) "शासकीय कर्मचारी" म्हणजे शासनाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कोणत्याही विभागातील किंवा कार्यालयातील राजपत्रित पदावर किंवा अराजपत्रित तृतीय श्रेणीतील पदावर नामनिर्देशनाद्वारे, पदोन्नतीद्वारे किंवा बदलीद्वारे नेमणूक केलेली कोणतीही व्यक्ती व त्यात बदलीयोग्य किंवा बदलीयोग्य नसलेल्या अखिल भारतीय सेवांमधील अधिका-यांचा समावेश होतो, मात्र त्यात कोणत्याही न्यायिक अधिका-यांचा किंवा कोणत्याही अराजपत्रित, तृतीय वर्ग न्यायिक विभागातील कर्मचा-यांचा समावेश होणार नाही,

(ग) "उच्चस्तर परीक्षा" म्हणजे या नियमांद्वारे विहित केलेली आणि एतदर्थ मंडळाकडून वेळोवेळी घेण्यात येणारी मराठी भाषा उच्चस्तर परीक्षा,

(ह) "निम्नस्तर परीक्षा" म्हणजे या नियमांद्वारे विहित केलेली आणि एतदर्थ मंडळाकडून वेळोवेळी घेण्यात येणारी मराठी भाषा निम्नस्तर परीक्षा,

(आय) "माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा" म्हणजे महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळे अधिनियम, 1965 (1965 चा महाराष्ट्र 41) या अन्वये घटित केलेली विभागीय मंडळाकडून, त्या अधिनियमामध्ये व्याख्या केल्याप्रमाणे माध्यमिक शिक्षणाच्या टप्प्यांच्या अखेरीस घेतली जाणारी अंतिम परीक्षा.

3. नियम 4 च्या तरतुदींना अधीन राहून, प्रत्येक राजपत्रित आणि अराजपत्रित शासकीय कर्मचा-याने, -

(एक) हे नियम अंमलात येण्याची तारीख किंवा त्याच्या नेमणुकीची तारीख यांपैकी जी नंतरची असेल त्या तारखेपासून दोन वर्षांच्या कालावधी संपण्यापूर्वी निम्नस्तर परीक्षा, आणि

(दोन) निम्नस्तर परीक्षा उत्तीर्ण झाल्यापासून दोन वर्षांचा कालावधी संपण्यापूर्वी उच्चस्तर परीक्षा, उत्तीर्ण होणे आवश्यक असेल.

टीप:- या नियमांतील नियम 4, पोट नियम (6) अन्वये निम्नस्तर परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून ज्याला सूट मिळाली आहे अशा, अखिल भारतीय सेवेतील अधिका-याने तो राज्य सेवेत दाखल झाल्याच्या तारखेपासून चार वर्षांच्या कालावधीत उच्चस्तर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

4. (1) नियम 3 मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जर एखादा शासकीय कर्मचारी -

(एक) विद्यमान नियमांनुसार परीक्षा उत्तीर्ण झालेला असेल,

(दोन) विद्यमान नियमांनुसार तो, सूट मिळण्यास पात्र असेल किंवा त्याला सूट मिळाली असेल,

(तीन) त्याची मातृभाषा मराठी असेल,

(चार) शासकीय सेवेत दाखल होण्यापूर्वी, तो 100 गुणांची प्रश्नपत्रिका असलेला एक उच्चस्तरीय विषय म्हणून मराठी या विषयासह माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा किंवा समतुल्य परीक्षा उत्तीर्ण झालेला असेल, किंवा

(पाच) तो ज्या पदाची आवश्यक सेवाप्रवेश अर्हता माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेच्या दर्जापेक्षा कमी असेल असे पद धारण करणारा तृतीय वर्ग शासकीय कर्मचारी असेल,

तर, त्याला या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येईल.

परंतु असे की, ज्या शासकीय कर्मचा-यांच्या सेवा तांत्रिक किंवा कष्टाच्या स्वरुपाच्या असतील आणि ज्यांना मराठी भाषेत पत्रव्यवहार करण्याची आवश्यकता नसेल अशा कर्मचा-यांना त्यांचा संबंधित प्रशासनिक विभाग सामान्य प्रशासन विभागाशी विचारविनिमय करुन अशा परीक्षा उत्तीर्ण होण्यातून सूट देऊ शकेल.

(2) आपली मातृभाषा मराठी आहे असा दावा सांगणा-या शासकीय कर्मचा-याला पुढील शर्ती पूर्ण कराव्या लागतील -

(एक) त्याला मराठी भाषा देवनागरी लिपीत सहजपणे लिहिता आली पाहिजे,

(दोन) त्याने, आपण मराठी भाषेत प्रभावीपणे पत्रव्यवहार करु शकतो अशा आशयाचे त्याच्या विभाग प्रमुखाचे/कार्यालय प्रमुखाचे प्रमाणपत्र सादर केले पाहिजे.

(3) जो शासकीय कर्मचारी आपली मातृभाषा मराठी असल्याचा दावा करीत नसेल परंतु त्याने मराठी माध्यमातून शिक्षण घेतले असल्याचे तो सांगत असेल आणि तो मराठी विषय घेऊन माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा किंवा उच्चस्तर परीक्षा उत्तीर्ण झालेला नसेल तर, या नियमांपासून सूट मिळण्यासाठी त्याला पुढील शर्ती पूर्ण कराव्या लागतील:-

(अ) त्याला देवनागरी लिपीत सहजपणे लिहिता आले पाहिजे,

(ब) त्याने किमान 7 व्या इयत्तेपर्यन्तचे शिक्षण मराठी माध्यमातून घेतले असल्याचे दर्शविणारे संबंधित संस्थेचे प्रमाणपत्र सादर केले पाहिजे, आणि

(क) तो मराठी भाषेत पत्रव्यवहार करु शकतो अशा आशयाचे विभाग प्रमुखाचे/कार्यालय प्रमुखाचे प्रमाणपत्र त्याने सादर केले पाहिजे.

(4) या नियमाखाली येणा-या शासकीय कर्मचा-यांच्या संबंधात अशा शासकीय कर्मचा-याचा नियुक्ती प्राधिकारी किंवा यथास्थिती विभाग प्रमुख आदेश काढील.

(5) ज्यांची मातृभाषा कोंकणी आहे असा शासकीय कर्मचारी परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळण्यास पात्र असणार नाही.

(6) अखिल भारतीय सेवेतील अधिकारी, हा त्याच्या राष्ट्रीय अकादमीमधील प्रशिक्षणाच्या कालावधीत मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण झाला असेल तर, त्याला निम्नस्तर परीक्षेतून सूट देण्यात येईल.

5. विहित कालावधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण न होणारा शासकीय कर्मचारी, उक्त कालावधी समाप्त झाल्यानंतर, तो अशी एक किंवा यथास्थिती दोन्ही परीक्षा उत्तीर्ण होईपर्यंत किंवा नियम 4 च्या तरतुदीनुसार ती/त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्याला सूट देण्यात येईपर्यन्त, त्याच्या वेतनवाढी रोखल्या जाण्यास पात्र ठरेल.

टीप-1 परीक्षा ज्या तारखेला संपली असेल त्या तारखेच्या लगतनंतरची तारीख ही परीक्षा उत्तीर्ण झाल्याची तारीख असल्याचे समजण्यात येईल.

टीप-2 अशा प्रकारे रोखून धरलेल्या वेतनवाढी, शासकीय कर्मचारी ज्या तारखेला परीक्षा उत्तीर्ण होईल किंवा ज्या तारखेला त्याला अशा प्रकारे उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येईल अशा तारखेला देय होतील आणि जणूकाही त्याच्या वेतनवाढी रोखल्या गेल्या नव्हत्या असे समजून त्या उपार्जित होतील. परंतु वेतनवाढी रोखून धरल्यामुळे देय होणारी थकबाकी मिळण्यास त्याला हक्क असणार नाही.

6. निम्नस्तर व उच्चस्तर परीक्षांच्या प्रश्नपत्रिका, अभ्यासक्रम आणि त्या उत्तीर्ण होण्याचा दर्जा या बाबी त्या नियमांच्या अनुक्रमे परिशिष्ट "अ" व "ब" मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील.

7. एतदर्थ मंडळ, या परीक्षा सर्वसामान्यपणे दरवर्षी जानेवारी व जुलै या महिन्यांच्या पहिल्या सोमवारी आणि जर असा सोमवार हा सुटीचा दिवस असेल तर त्यानंतरच्या कामाच्या दिवशी त्याच्याकडून निश्चित करण्यात येईल अशा ठिकाणी घेईल.

8. यापैकी कोणत्याही परीक्षेला बसण्याची इच्छा असणा-या शासकीय कर्मचा-याने आपला अर्ज, कार्यालय प्रमुखांमार्फत/विभाग प्रमुखांमार्फत, त्या परीक्षेच्या तारखेपूर्वी 60 दिवस अगोदर एतदर्थ मंडळाच्या सचिवांकडे पाठवला पाहिजे.

9. या नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, शासनाला, विशेष परिस्थितीमध्ये, या नियमांच्या कोणत्याही तरतुदी, त्याला न्याय्य व सयुक्तिक वाटतील अशा रीतीने शिथिल करता येतील.

## परिशिष्ट "ब"

### एतदर्थ मंडळाच्या मराठी भाषा परीक्षेच्या अभ्यासक्रमाची यादी
### (राजपत्रित अधिकारी व अराजपत्रित कर्मचा-यांसाठी)

**उच्चस्तर परीक्षा:**

(अ) महाराष्ट्र माध्यमिक शालांत परीक्षा मंडळाने इयत्ता दहावीसाठी अमराठी भाषिकांकरिता वेळोवेळी विहित केलेले मराठी पाठ्यपुस्तक मराठी वाचनपाठ (द्वितीय भाषा) (फक्त गद्य विभाग).

(ब) राजभाषा परिचय या पुस्तकातील कार्यरुप व्याकरण.

**निम्नस्तर परीक्षा:**

(क) महाराष्ट्र माध्यमिक शालांत परीक्षा मंडळाने इयत्ता नववीसाठी अमराठी भाषिकांकरिता वेळोवेळी विहित केलेले मराठी पाठ्यपुस्तक मराठी वाचनपाठ (द्वितीय भाषा) (फक्त गद्य विभाग).

(ड) राजभाषा परिचय या पुस्तकातील कार्यरुप व्याकरण.

**उच्चस्तर परीक्षा - पाठ्यक्रम :**

प्रश्नपत्रिका 1:- (1) महाराष्ट्र माध्यमिक शालांत परीक्षा मंडळाने इयत्ता दहावीसाठी अमराठी भाषिकांकरिता वेळोवेळी विहित केलेले मराठी पाठ्यपुस्तक (फक्त गद्य विभाग). - गुण 70

(2) राजभाषा परिचय या पुस्तकातील कार्यरुप व्याकरण. - गुण 30

प्रश्नपत्रिका 2:- (1) दिलेल्या विषयांवर सुसंगत लेखन (सुसंगत लेखन कार्यालयीन जीवनाशी संबंधित असलेल्या विषयावर असावे.). - गुण 40

(2) प्रशासनिक लेखन - गुण 60

(अ) पत्रलेखन, (ब) टिप्पणी, (क) प्रशासकीय वाक्प्रयोग व पदनामे,
(ड) अनुवाद (इंग्रजी - मराठी) (प्रत्येकी 15 गुण).

**निम्नस्तर परीक्षा:**

प्रश्नपत्रिका 1:- (1) महाराष्ट्र माध्यमिक शालांत परीक्षा मंडळाने इयत्ता नववीसाठी अमराठी भाषिकांकरिता वेळोवेळी विहित केलेले मराठी पाठ्यपुस्तक (फक्त गद्य विभाग). - गुण 70

(2) "राजभाषा परिचय" या पुस्तकातील कार्यरुप व्याकरण. - गुण 30

प्रश्नपत्रिका 2:- (1) दिलेल्या विषयावर सुसंगत लेखन (सुसंगत लेखन कार्यालयीन जीवनाशी संबंधित असलेल्या विषयावर असावे). - गुण 40

(2) प्राथमिक स्वरुपाचे प्रशासनिक लेखन - गुण 60

(अ) पत्रलेखन, (ब) टिप्पणी लेखन, (क) प्रशासकीय वाक्प्रयोग व पदनामे,
(ड) अनुवाद (इंग्रजी - मराठी) (प्रत्येकी 15 गुण).

दुस-या प्रश्नपत्रिकेसाठी प्रशासनिक लेखन, प्रशासन वाक्प्रयोग, पदनाम कोश ही पुस्तके संदर्भग्रंथ म्हणून विहित करण्यात येत आहेत.

निम्नस्तर व उच्चस्तर या दोन्ही परीक्षांना 50 गुणांची तोंडी परीक्षा देखील असेल. लेखी परीक्षा चालू असतानाच तोंडी परीक्षा घेण्यात यावी व लेखी परीक्षेसाठी 15 मिनिटे अधिक वेळ देण्यात यावा. या परीक्षेचे स्वरुप पुढीलप्रमाणे असावे -

(1) वाचन व आकलन - 20 गुण, (2) भाषण - 15 गुण, (3) संभाषण - 15 गुण.

उच्चस्तर परीक्षेच्या पहिल्या प्रश्नपत्रिकेला तोंडी परीक्षेचा 15 मिनिटांचा वेळ धरुन 2 तास 45 मिनिटे वेळ ठेवण्यात यावा. दुस-या प्रश्नपत्रिकेला 2 तास 30 मिनिटे वेळ ठेवण्यात यावा. त्याचप्रमाणे निम्नस्तर परीक्षेच्या पहिल्या प्रश्नपत्रिकेला 2 तास 30 मिनिटे वेळ ठेवण्यात यावा व दुस-या प्रश्नपत्रिकेला तोंडी परीक्षेच्या 15 मिनिटांचा वेळ धरुन 2 तास 45 मिनिटे वेळ ठेवण्यात यावा.

---

## परिशिष्ट "ब"

### मराठी भाषा परीक्षेचा दर्जा खालीलप्रमाणे असेल:-

(1) उत्तीर्ण होण्यासाठी प्रत्येक उत्तरपत्रिकेत व तोंडी परीक्षेत 50% गुण आवश्यक असतील. सूट मिळवण्यासाठी उत्तरपत्रिकेत किंवा तोंडी परीक्षेत 60 टक्के किंवा त्यापेक्षा अधिक गुण आवश्यक असतील.

(2) अनुग्रह गुण देण्याबाबत:- एखादा उमेदवार लेखी अथर मौखिक परीक्षेत 4-5 गुण कमी पडल्यामुळे अनुत्तीर्ण ठरत असेल तर त्यास लेखी अथर मौखिक परीक्षेत एका अथर दोन पेपरात प्रत्येकी जास्तीत जास्त पाच पर्यन्त व एकूण दहा पर्यन्त अनुग्रह गुण देता येतील. मात्र त्यासाठी त्याला दोन्ही प्रश्नपत्रिका व तोंडी परीक्षा मिळून एकूण 50 टक्के गुण मिळाले असले पाहिजेत. त्याचा निकाल जाहीर करताना "अनुग्रह गुण देऊन उत्तीर्ण" असा शेरा दिला जाईल. अनुग्रह गुण देण्याची ही सवलत संपूर्ण परीक्षेला (दोन लेखी व मौखिक) बसणा-या उमेदवारांसाठीच आहे. पूर्वीच्या परीक्षेत एखाद्या पेपरात मिळालेल्या "सूट" चा लाभ घेतलेल्या उमेदवारास अनुग्रह गुण मिळणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

वि.मो. पाध्ये,

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

## NOTIFICATION

General Administration Department,
Mantralaya, Bombay 400 032?
Dated the 30th December 1987?

**Constitution of India**

No.MABHAP-1087/14/CR 2/87/20- In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules and orders issued in this behalf and in force in the State of Maharashtra or any part thereof, the Government of Maharashtra is hereby pleased to make the following rules regarding the Government Servants (Other than Judicial Department Servants) Marathi Language Examination in the State of Maharashtra, namely:-

1. These rules may be called the Maharashtra Government Servants (Other than Judicial Department Servants) Marathi Language Examination Rules, 1987.

2. In these rules, unless the context otherwise requires --

(a) "Appendix" means an Appendix appended to these rules;
(b) "Board" means the Adhoc Board (Marathi Language Examination) General Administration Department, Mantralaya, Bombay 400 032, constituted by Government Resolution, General Administration Department, No.TRG-1462-M, dated the 14th February 1963;

(c) "Examinations" means the Lower and Higher level Marathi language examinations prescribed under these rules and held by the Board from time to time;

(d) "Existing rules" means the rules and orders in force for Gezetted and non-Gazetted Government Servants for Marathi Language Examination, immediately before the date of publication of these rules in the Official Gazettee;

(e) "Government" means the Government of Maharashtra;

(f) "Government Servant" means any person appointed by nomination, promotion or transfer to a Gazetted post or a non-Gazetted Class III post, in any Department or Office under the administrative control of Government and includes officers belonging to the All India Services whether transferable or non-transferable, but shall not include any judicial Officers or any non-Gazetted, Class III Judicial Department Servants;

(g) "High Standard Examination" means the Higher Standard Examination in Marathi Language prescribed under these rules held by the Board, from time to time;

(h) "Lower Standard Examination" means the Lower Standard Examiation in Marathi Language, prescribed under these rules and held by the Board from time to time;

(i) "Secondary School Certificate Examiantion" means a final examination conducted by a Divisional Board constituted under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Boards Act, 1965 (Mah.XLI of 1965), at the end of the secondary stage of education as defined in that Act.

3. Subject to the provisions of rule 4, every Gazeted or non-Gazetted Goernment Servant shall be required to pass the -

(i) Lower Standard Examination before the expiry of two years from the date of coming into operation of these rules or from the date of his appointment, whichever is later; and

(ii) Higher Standard Examination before the expiry of two years after his passing the Lower Standard Examination.

Note:- An Officer belonging to the All India Services who is exempted from passing the Lower Standard Examination under sub-rule (6) of rule 4 of these rules, shall be required to pass the Higher Standard Examiantion within four years from the date of his joining the State service.

4. (1) Notwithstanding anything contained in rule 3, a Government Servant shall be exempted from passing of the examinations if, -

(i) he has passed the examinations according to the existing rules;

(ii) he was eligible for exemption or was exempted under the existing rules;

(iii) his mother tongue is Marathi;

(iv) he has passed the Secondary School Certificate Examination or equivalent examination with Marathi as a higher standard subject of 100 marks' paper, prior to joining the Government service; or

(v) he is a class III government servant holding a post for which requisite recruitment qualification is less than passing of the Secondary School Certificate Examination level:

Provided that, Government Servants whose duties are of technical or arduous nature and who are not required to correspond in Marathi Language, may be exempted from passing the Examinations by the concerned Administrative Department in consultation with the General Administration Department.

(2) A Government Servant who claims that his mother tongue is

Marathi shall fulfil the following conditions, -

(i)he should be able to write Marathi language in Devnagari script, with facile;

(ii)he should produce a certificate from his Head of the Department/Office that he can effectively correspond in Marathi.

(3) A Government Servant who does not claim that his mother tongue is Marathi but that he has studied in Marathi medium and who has not passed Secondary School Certificate or Higher Standard Examination with Marathi shall fulfil the following conditions for getting exemption from these rules:-

(a) he should be able to write with facile in Devnagari script;

(b) he should produce a certificate from the concerned Institute indicating that he has taken education in Marathi medium at least upto 7th standard; and

(c) he should produce a certificate from the Head of Department/Office that he can correspond in Marathi.

(4) The Appointing Authority or the Head of the Department as the case may be, of a Government servant shall, issue orders in respect of the Government Servant falling under this rule.

(5) A Government Servant whose mother tongue is Konkani shall not be eligible for exemption from passing the examinations.

(6) An Officer belonging to the All India Services shall be exempted from passing the Lower Standard Examination if he has passed the Marathi language examination during the period of his training in the National Academy.

5. A Government Servant who fails to pass the examinations within the prescribed period shall, after the expiry of the said period, be liable to have his increments withheld until he passes the examination or examinations, as the case may be, or is exempted from passing the same under the provisions of rule 4.

Note 1:- The date of passing the examination shall be deemed to be the date following the date on which the examination ends;

Note 2:- Increments so withheld shall become payable to the Government Servant with effect from the date on which he passes the examination or is exempted from passing it and increments shall accrue to him as if no increments had been withheld. He shall not be entitled for the arrears due to withholding of increments.

6. The papers, syllabus and standard of passing the lower and higher level Marathi Examinations shall be as is mentioned in the Appendices 'A' and 'B' respectively to these rules.

7. The Board shall hold the examinations ordinarily on the first Monday and if the first Monday falls on a holiday, the subsequent working day in the months of January and July every year, at such places as may be decided by it.

8. A Government Servant who desires to appear for any of the examinations should forward his application through the Head of Office/Department, at least 60 days before the date of the examination, to the Secretary of the Board.

9. Notwithstanding anything contained in these rules, Government may relax provisions of any of these rules under special circumstances in such manner as shall appear to it to be just and reasonable.

H-130(3,000-5-93)-6

## APPENDIX-A

## Syllabus for Ad-hoc Board's Marathi Language Examinations for the Gazetted and Non-Gazetted Government Servants.

### HIGHER STANDARD EXAMINATION:

(A) A Text-Book prescribed from time to time for the Xth Standard by the Maharashtra State Secondary Examination Board for Non-Marathi Students viz. "Marathi Vachan Path" (Second Language) prose section only.

(B) The book Rajabhasha Parichaya - Functional Grammer.

### LOWER STANDARD EXAMINATION:

(C) A Text-Book prescribed from time to time for the IXth Standard by the Maharashtra State Secondary Examination Board for Non-Marathi Students viz., "Marathi Vachan Path" (Second Language) prose section only.

(D) The Book Rajabhasha Parichaya - Functional Grammer.

### HIGHER STANDARD EXAMINATION - SYLLABUS:

| | | MARKS |
|---|---|---|
| Question Paper-I | (1) A Text-Book prescribed for the Xth Standard by Maharashtra State Secondary Examination Board for Non-Marathi Students (Prose Section only). | 70 |
| | (2) Functional Grammer from Rajabhasha Parichaya. | 30 |
| Question Paper-II | (1) Writing a paragraph on a given subject (Subject should be related to routine office work). | 40 |
| | (2) Official Correspondence (Prashasanik Lekhan).<br>(a) Drafting or letter writing.<br>(b) Noting.<br>(c) Administrative Phrases and designations.<br>(d) Translation (English-Marathi) (15 Marks each). | 60 |

### LOWER STANDARD EXAMATION:

| | | MARKS |
|---|---|---|
| Question Paper-I | (1) A Text-Book prescribed for IXth Standard by Maharashtra State Secondary Examination Board for Non-Marathi Students (Prose Section only). | 70 |
| | (2) Functional Grammer Section from Rajabhasha Parichaya. | 30 |

H-130(3,000-5-93)-6a

| | | | MARKS |
|---|---|---|---|
| Question Paper-II | (1) | Writing a paragraph on a given subject (Subject should be related to routine office work). | 40 |
| | *(2) | Preliminary Office Correspondence (Preliminary Prashasanik Lekhan). | 60 |
| | | (a) Drafting or letter Writing. | |
| | | (b) Noting. | |
| | | (c) Administrative Phrases and Designations. | |
| | | (d) Translation (English-Marathi) (15 Marks each). | |

*The books "Prashasanik Lekhan", "Prashasan Vakprayog" and "Padanam Kosh" are prescribed as reference books for Paper-II.

Both the Higher and Lower Standard Examination include on Oral Examination of 50 Marks. This should be held while the written examination is in progress and the time for written examination should be enhanced by 15 minutes on that account. The nature of this examination shall be as follows:-

(1) Reading and Comprehension ... 20 Marks

(2) Speaking ... 15 Marks

(3) Conversation ... 15 Marks

The period for the first question paper of the Higher Standard Examination shall be 2 hours 45 minutes including 15 minutes period for the Oral Examination. The period for question Paper II should be 2 hours 30 minutes. The period for the 1st question paper of the lower Standard Examination shall also be 2 hours 30 minutes and that for the IInd Paper 2 hours 45 minutes including 15 minutes period for the Oral Examination.

## APPENDIX-B

### The standard for passing the Marathi Language Examination

1. For passing the Marathi Language Examination 50% marks should be obtained in each of the written papers as well as in the oral examination. 60% marks should be obtained either in the written papers or in the oral examination for claiming exemption.

2. Provision of grace marks:- A candidate failing either in the written papers or in the oral examination by 4-5 marks, may be allowed maximum 5 grace marks in either of the written papers or in the oral examination so, however, that the maximum grace marks will be ten only. A candidate must have obtained 50% marks in aggregate in the written and oral examination. His result will be declared with the remarks "Passed with the grace marks". The concession of grace marks is available only in the case of those candidates who are appearing for the entire (Two written papers and oral) examination. A candidate claiming exemption in any of the written papers or oral examination, shall not be eligible for concession of grace marks.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. G. PADHYE,
Deputy Secretary to Government.

---

H-130(3,000-5-93)-7a